उपविभागीय पोलीस अधिकारी कार्यालय, मालेगांव कॅम्प सटाणा या कार्यालयाचे स्थलांतर मालेगांव शहरात करणेबाबत..

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन निर्णय क्रमांकः टीटीसी ०२१५/प्र. क्र. १९१/पोल-३

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक: ३० सप्टेंबर २०१५

**वाचा-** १) शासन पत्र क्र. टीटीसी-०२१५/प्र. क्र. १९१/पोल-३, दि.२०.८.२०१५ अन्वये निर्गमीत केलेले इतिवृत्त.

२) अपर पोलीस महासंचालक (नि. व स.), पोलीस महासंचालक यांचे कार्यालय यांचे क्र. पोमसं/ २६-अ /४७ /वडनेर (मालेगांव) नाशिक ग्रा /४२ /२०१३, दि.५.९.२०१५ चे पत्र.

**प्रस्तावना -**

वडनेर (खाकुर्डी), ता. मालेगांव पोलीस ठाण्याचे कामकाज मालेगांव पोलीस उपविभागीय अधिकारी कार्यालयास जोडणेबाबत, मा. राज्यमंत्री, गृह (ग्रामीण) यांचे अध्यक्षतेखाली दि.२२.७.२०१५ रोजी बैठक पार पडली होती. सदरहू बैठकीमध्ये मा. राज्यमंत्री, गृह (ग्रामीण) यांनी दिलेल्या निर्देशानुसार, अपर पोलीस महासंचालक (नि. व स.), पोलीस महासंचालक यांचे कार्यालय यांनी संदर्भाधीन क्र. २ वरील दि.५.९.२०१५ चे पत्रान्वये शासनास प्रस्ताव सादर केला आहे. त्याबाबत निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

मा. राज्यमंत्री, गृह (ग्रामीण) यांनी दि.२२.७.२०१५ चे बैठकीमध्ये दिलेल्या निर्देशानुसार आणि अपर पोलीस महासंचालक (नि. व स.), पोलीस महासंचालक यांचे कार्यालय यांचे दि.५.९.२०१५ चे प्रस्तावानुसार उपविभागीय पोलीस अधिकारी कार्यालय, मालेगांव ग्रामीण कॅम्प, सटाणा या कार्यालयाचे स्थलांतर मालेगांव शहरामध्ये करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे. त्यानुसार कार्यालय स्थलांतर करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९३०१४४१३२०५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KADAM DATTATRAY HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPT,CID - 918120, postalCode=400032, st=Maharashtra, cn=KADAM DATTATRAY HANMANT
Date: 2015.09.30 14:45:09 +05'30'

**(द. ह. कदम)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधानसचिव
२. मा. राज्यमंत्री,गृह (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव
३. मा. राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव
४. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)/लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक
८. विशेष पोलीस महानिरीक्षक, नाशिक परीक्षेत्र, नाशिक
९. पोलीस अधिक्षक, नाशिक (ग्रामीण)
१०.उपविभागीय पोलीस अधिकारी, मालेगांव ग्रामीण कॅम्प सटाणा, जि. नाशिक.
११.निवडनस्ती, पोल-३